**महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक धोरण, २०१० अंतर्गत राज्यातील जिल्हयाच्या ठिकाणी, ग्रंथोत्सव, २०१४ चे आयोजन करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः रासांधो-१०१४/प्र.क्र.१००/२०१४/भाषा-३,**

मादाम कामा मार्ग, मंत्रालय,

मुंबई - ४०० ०३२

तारीख: **१८ डिसेंबर, २०१४**

**वाचा :**

१) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. योजना-१०११/प्र.क्र.७६/२०११/भाषा ३, दि. २८ .११. २०११ व दि.२०.१२.२०११,

२) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.पूरक १०११/प्र.क्र.६६/२०११/भाषा-३, दि.२३.१२.२०११,

३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२००९/ अनौसं-४८/ प्र.क्र.१५४/ नवि-२०, दि. २७.२. २०१२.

४) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.रासांधो १०१२/प्र.क्र.९०/२०१२/भाषा-३, दि.२६.१२.२०१२,

५) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.रासांधो १०१३/प्र.क्र.१६७/२०१३/भाषा-३, दि.२०.११.२०१३,

**प्रस्तावना :**

ग्रामीण व शहरी भागातील लोकांमधील, वाचन संस्कृतीमध्ये वाढ व्हावी या हेतुने राज्य शासनातर्फे ग्रंथोत्सवाचे आयोजन करण्यात येते. ग्रंथप्रेमींना एकाच ठिकाणी विविध ग्रंथ प्राप्त व्हावेत यासाठी तसेच प्रकाशक आणि ग्रंथ विक्रेता यांना ग्रंथ विक्रीसाठी एकाच ठिकाणी आवश्यक ती सुविधा उपलब्ध व्हावी, हा ग्रंथमहोत्सव आयोजनाचा मुख्य उद्देश आहे. याकरीता शासन पातळीवरील प्रयत्नांचा भाग म्हणून प्रतिवर्षी ग्रंथोत्सवाचे आयोजन करण्यात येते. त्यासाठी राज्य शासनाच्या मराठी भाषा विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने ग्रंथोत्सव जोपासना अभियान अंतर्गत "ग्रंथोत्सव-२०१४" हा उपक्रम राज्यातील जिल्हयांच्या ठिकाणी राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक धोरण - २०१० अंतर्गत "ग्रंथोत्सव-२०१४" हा उपक्रम राज्यातील जिल्हयांच्या ठिकाणी (मुंबई व बृहन्मुंबई वगळून) महाराष्ट्र शासनाच्या, माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या ३४ जिल्हा माहिती अधिकारी तसेच उपसंचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली व पणजी (गोवा) यांच्यामार्फत माहे डिसेंबर, २०१४ ते माहे फेब्रुवारी, २०१५ या कालावधीत राबविण्यात येईल. सदर उपक्रम राबविण्यासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेला निधी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांनी आहरित व वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्यातील सर्व जिल्हयाच्या ठिकाणी "ग्रंथोत्सव" हा उपक्रम राबविण्यासाठी सर्व जिल्हा ग्रंथालय अधिका-यांनी जिल्हा माहिती अधिका-यांना सहकार्य करावे.

३. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांनी सदर निधी संबंधित जिल्हयाचे जिल्हा माहिती अधिकारी यांना व उपसंचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली आणि उपसंचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, पणजी, गोवा यांना प्रत्येकी **रुपये १.५० लक्ष (रुपये एक लक्ष पन्नास हजार फक्त)** याप्रमाणे वितरित करावा.

४. यासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या त्यांच्या अधिपत्याखालील दुय्यम अधिकाऱ्यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास या आदेशाव्दारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. **"ग्रंथोत्सव-२०१४"** च्या आयोजनाच्या खर्चाचा सर्व तपशील संबंधीत जिल्हयाच्या जिल्हा माहिती अधिकाऱ्यांकडून सदरहू ग्रंथोत्सव झाल्यानंतर एक महिन्याच्या कालावधीत सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांनी प्राप्त करुन घ्यावा व सदर तपशील शासनास सादर करावा.

६. या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात, मागणी क्रमांक झेडएफ ०२ - २२०५ - कला व संस्कृती (०२) (०२) - राज्य साहित्य व संस्कृती मंडळ (२२०५ ३२१४) - ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१८११५८५७८६३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhaku Raghunath Chindarkar

Digitally signed by Dhaku Raghunath Chindarkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dhaku Raghunath Chindarkar
Date: 2014.12.18 12:09:32 +05'30'

**(धा.र.चिंदरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

५. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
८. महासंचालक, ग्रंथालय संचालनालय,
९. अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
१०.संचालक / उपसंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (१०प्रती),
११.संचालक / उपसंचालक, ग्रंथालय संचालनालय,
१२.संचालक, भाषा संचालनालय, बांद्रा, मुंबई,
१३.संचालक राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
१४.उप संचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
१५.उप संचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, पणजी, गोवा,
१६.सर्व जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,
१७.सर्व जिल्हा ग्रंथालय अधिकारी , ग्रंथालय संचालनालय,
१८. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
१९.वित्त विभाग / व्यय-४, मंत्रालय, मुंबई,
२०.अवर सचिव (अर्थसंकल्प), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१.सर्व कार्यासने, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.भाषा-३ (निवडनस्ती).